**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, छत्रपती संभाजीनगर या संस्थेच्या अधिपत्याखालील ३० रुग्ण खाटांच्या आरोग्य पथक, पैठण या संस्थेचे १०० रुग्ण खाटांच्या रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्यासाठी इमारत बांधकाम अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : आरएचपी-२०२३/प्र.क्र.१४१/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२३

**वाचा :**

१) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र.डीएमईआर-१२०१६/११/२०२२-ईडीयु, दिनांक २७.०३.२०२३.

२) कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग,पत्र क्र.बैठक-२०२३/प्र.क्र.३०/इमा-१, दिनांक १३.०७.२०२३.

**शासन निर्णय :**

विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, छत्रपती संभाजीनगर या संस्थेच्या अधिपत्याखालील ३० रुग्ण खाटांच्या आरोग्य पथक, पैठण या संस्थेचे १०० रुग्ण खाटांच्या रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धन करण्यासाठी इमारत बांधकाम करण्याकरीता एकूण रुपये ४३,५६,२१,९१६/- (रुपये त्रेचाळीस कोटी, छप्पन लक्ष, एकवीस हजार, नऊशे सोळा फक्त) इतक्या रक्कमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अदांजित किंमत |
|---|---|---|
| १ | आरोग्य पथक, पैठण या संस्थेचे श्रेणीवर्धन इमारत व बांधकाम | ४३,५६,२१,९१६ |
| एकूण अंदाजित रक्कम | | ४३,५६,२१,९१६ |

**अटी :-**

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक -२०१७/प्र.क्र११/नियोजन-३,दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) इमारतीमध्ये दिव्यांगाकरीता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

९) प्रस्तावित बांधकाम खाजगी वास्तुशास्त्रज्ञानी तयार केलेल्या नकाशावर आधारित असल्याने सदर नकाशात मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम, मुंबई यांची सहमती/स्वाक्षांकन प्राप्त करून घेण्यात यावे. अंदाजपत्रकातील विविध कक्षांचे क्षेत्रफळ विहित निकषांनुसार आहे किंवा कसे, याबाबत मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून खातरजमा करण्यात यावी.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ११.०७.२०२३ रोजी आयोजित उच्चाधिकार समितीच्या बैठकीत प्राप्त सहमती व त्यानुषंगाने प्राप्त इतिवृत्तानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२४१७४९५७०६१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.08.25 11:50:49 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.

२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
५) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
६) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
७) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
८) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, छत्रपती संभाजीनगर.
९) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर
१०) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजीनगर
११) जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
१२) निवडनस्ती (प्रशा-१)